"सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य" या योजनेतील प्रत्येक प्रकल्पामध्ये भाग घेणाऱ्या नोंदणीकृत सहकारी संस्थांचे भागभांडवल, कर्ज व अनुदान यांचे प्रमाण ठरविण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण १०१८/प्र.क्र.१२६/१८-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये सद्यस्थितीत अटल महापणन विकास अभियानांतर्गत ५००० विविध कार्यकारी सहकारी संस्थांचे सक्षमीकरण करण्याची कार्यवाही २०१६ पासून सुरू आहे. विविध कार्यकारी सहकारी संस्थांशिवाय पणन, प्रक्रिया, सेवा व अन्य प्रकारच्या सहकारी संस्थांनीही व्यवसायाभिमुख प्रकल्प राबविणे गरजेचे आहे. अशा सहकारी संस्थांच्या उपविधीमध्ये कृषी मालावर प्रक्रिया, मूल्यवर्धन करावयाच्या बाबी तसेच योजनेमध्ये समाविष्ट असलेल्या नाविन्यपूर्ण उपक्रमांचा समावेश असणे आवश्यक असेल. अशा सहकारी संस्थांचे व्यवसाय / प्रकल्प कार्यान्वित करून पर्यायाने प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रोजगारनिर्मिती करण्यासाठी राज्यातील सहकारी संस्थांसाठी नवीन योजनेची आवश्यकता असल्याने "सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजना" कार्यान्वित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

त्यास अनुसरून दिनांक १८/११/२०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजनेतील प्रत्येक प्रकल्पामध्ये भाग घेणाऱ्या नोंदणीकृत सहकारी संस्थांचे स्वत:चे भाग भांडवल, शासकीय कर्ज आणि अनुदान याचे प्रमाण, विभागाच्या इतर चालू योजनामध्ये मंजूर करण्यात आलेले भागभांडवल, शासकीय कर्ज आणि अनुदान याच्या प्रमाणाची पार्श्वभूमी ठरविण्यासाठी समिती गठीत करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**०२. शासन निर्णय:-**

सहकारी संस्थांसाठी अटल अर्थसहाय्य योजनेबाबतच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाने दिनांक १८/११/२०१८ रोजीच्या बैठकीमध्ये मान्यता दिली आहे. त्यामध्ये सदर योजनेमधील प्रत्येक प्रकल्पांमध्ये भाग घेणाऱ्या नोंदणीकृत सहकारी संस्थांचे स्वतःचे भाग भांडवल, शासकीय कर्ज आणि अनुदान याचे प्रमाण, विभागाच्या इतर चालू योजनांमध्ये मंजूर करण्यात आलेले भाग भांडवल, कर्ज व अनुदान याच्या प्रमाणाची पार्श्वभूमी ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| (१) मा.मंत्री (वित्त व नियोजन) | अध्यक्ष |
| (२) मा.मंत्री (सहकार) | सदस्य |
| (३) मा.मुख्य सचिव | सदस्य |

०३. सदर योजनेतील तरतूदींबाबत आवश्यक त्या सुधारणा करण्याचे अधिकार मा.मुख्य सचिव यांना देण्यात आले आहेत.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१८१२२११४११४०४३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2018.12.21 14:16:02 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

अवर सचिव तथा सहनिबंधक सहकारी संस्था,

महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री, यांचे अप्पर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई

२) मा. मंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई

५) मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

६) मा. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

७) मा.प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

८) मा.सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

९) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे

१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकार विकास महामंडळ, पुणे

११) निवड नस्ती.